बॉम्बे इंजिनिअरिंग ग्रुप अॅन्ड सेंटर, खडकी, पुणे येथील सैनिकी सेवेतील कन्स्ट्रक्शन सुपरवायझर श्रेणी-१ या पदावरील कामाच्या कारकिर्दीच्या आधारे देण्यात येणारे प्रमाणपत्र "स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक" या पाठयक्रमाशी समकक्ष ठरविण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग
शासन निर्णय, क्रमांक-स्थाअस-२००९/प्र.क्र.२९५/आस्था.९
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक- २६ फेब्रुवारी, २०१०

वाचा- १) शासन अधिसूचना, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्रमांक-स्थाअनि-२००२/प्र.क्र.४२५/आस्था-९, दिनांक- २ फेब्रुवारी, २००६
२) शासन निर्णय,ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्रमांक-स्थाअस-३९०८/प्र.क्र.२९२/आस्था.९, दिनांक - २३ सप्टेंबर, २००८
३) कार्यकारी अभियंता, बांधकाम विभाग, जिल्हा परिषद, वर्धा यांचे पत्र क्रमांक- जिपव/काअ/बांध/स्था.१/वशि-५८८/०९, दिनांक- ११.०८.२००९

शासन निर्णय :- जिल्हा परिषदांमधील "स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक" या पदावरील नियुक्तीकरिता उपरोक्त संदर्भ क्रमांक १ च्या शासन अधिसूचने अन्वये सेवाप्रवेश नियम विहित करण्यात आले आहेत. सदर अधिसूचनेच्या नियम-२ (१) (ब) (दोन) मध्ये या पदासाठी विहित केलेला "स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक" हा एक वर्षाचा पाठयक्रम ही अर्हता धारण केलेले उमेदवार सदर पाठयक्रम बंद झाल्यामुळे उपलब्ध होत नसल्याने त्या ऐवजी शासनाच्या उपरोक्त संदर्भ क्रमांक २ येथिल शासन आदेशान्वये पूढील पाठयक्रम समकक्ष म्हणून घोषित केले आहेत :-

१) किमान स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यकाची एक वर्ष मुदतीची पाठयक्रम परीक्षा उत्तीर्ण ही अर्हता किंवा शासनाने वेळोवेळी समतुल्य घोषित केलेली अर्हता,
२) आर्किटेक्चरल ड्रॉफ्टस्मन (वास्तुशास्त्रीय आरेखक),
३) कन्स्ट्रक्शन सुपरवायझर (बांधकाम पर्यवेक्षक)
४) आरेखक (स्थापत्य )

२. याबाबत National Council of Training For Vocational Trades (NCTVT)/National Apprentice Certificate (NAC) व्दारा सैनिकी सेवेतील कन्स्ट्रक्शन सुपरवायझर पदावरील त्या शाखेतील अनुभव स्थापत्य अभियांत्रिकी मधील प्रमाणपत्र अभ्यासक्रमाशी समकक्ष ठरविण्यात आला असून त्यास केंद्र शासनाच्या श्रम मंत्रालयाच्या पत्र क्रमांक- DGETC-30018(22)/88-EE I Dated Nov.85 अन्वये मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार National Council of Training For Vocational Trades (NCTVT)/National Apprentice Certificate (NAC) व्दारा सैनिकी सेवेतील कन्स्ट्रक्शन

सुपरवायझर पदावरील या शाखेतील अनुभवाच्या आधारे देण्यात येणा-या प्रमाण पत्र धारकांना स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक या पाठयक्रमाशी समकक्ष समजण्यास शासन याद्वारे मान्यता देत आहे.

३. हे शासन आदेश उच्च व तंत्रशिक्षण विभागाच्या दिनांक १.१२.२००९ च्या अनौपचारिक संदर्भाने दिलेल्या अभिप्रायांनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

४. सदर शासन निर्णय (www.maharashtra.gov.in) या महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१००२२६१३४२४२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

(प्रकाश हिर्लेकर)
सह सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,
विभागीय आयुक्त (सर्व)
जिल्हा परिषदाचे मुख्य कार्यकारी अधिकारी (सर्व)
अवर सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
अवर सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
अवर सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
सर्व कार्यासन अधिकारी, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
निवड नस्ती (आस्था.०९), ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२